**शासकीय भिक्षेकरी गृह, मुख्यलेखाशीर्ष २२३५ २८७८ या लेखाशीर्षाअंतर्गत सन २०२४-२५ करीता पुनर्वितरणाद्वारे निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. भिक्षेगृ -२०२४/ प्र.क्र.३५/ का-९**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- १२/०७/२०२४

**वाचा-**

१) मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद यांचे सिव्हील अप्लीकेशन क्र. ३८८०/२०२४ इन रिट पिटीशन क्र. २२४७/२०२४ मधील दि. ०९/०५/२०२४ रोजीचे आदेश

२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.१ एप्रिल, २०२४

३) महिला व बाल विकास विभाग,शासन निर्णय क्र. बीजीटी-२०२४/प्र.क्र.२३/का-०४, दि. ०१/०४/२०२४, दि. १९.४.२०२४, दि. १०.५.२०२४, दि. १३.०६.२०२४, दि. २६.०६.२०२४ व ०९.७.२०२४

**प्रस्तावना:-**

मा. उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल रिट पिटीशन क्र. ४७०/२०१५ व सिव्हील ॲप्लीकेशन क्र. ३८८०/२०२४ इन रिट पिटीशन क्र. २२४७/२०२४ मध्ये दि ०९/०५/२०२४ रोजी मा. न्यायालयाने, श्री. तांबोळी यांना द्यावयाच्या उपदानाची रक्कम मा. उच्च न्यायालयामध्ये ६० दिवसामध्ये जमा करण्याबाबत निर्देश दिले होते. त्यानुषंगाने आयुक्तालयाने सादर केलेल्या प्रस्तावानुसार शासनपत्र दि.२६/०६/२०२४ अन्वये "विधी व न्याय विभाग, औरंगाबाद यांनी मा. उच्च न्यायालय मुंबई खंडपीठ, औरंगाबाद यांच्या दि.०९.०५.२०२४ रोजीच्या आदेशाविरुध्द मा.सर्वोच्च न्यायालय, दिल्ली येथे विशेष अनुमती याचिका दाखल करण्यास परवानगी दिल्यास त्यामधील अंतरीम /अंतिम आदेशाच्या अधिन राहून मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ औरंगाबाद येथे payment of graduity Act, १९७२ मधील तरतूदीनुसार उपदानाची रक्कम रु. १,६५,५६४/- (अक्षरी रुपये एक लाख पासष्ट हजार पाचशे चौसष्ट फक्त) लेखाशिर्ष २२३५-२८७८, १०-कंत्राटी सेवा या शिर्षातून जमा करण्यात यावी" असे अभिप्राय दिले आहेत.

तथापि २२३५-२८७८ या संकेतांकाखाली १०-कंत्राटी सेवा या उद्दिष्टासाठी लेखानुदानाद्वारे उपलब्ध निधी कंत्राटी सेवेवरील कर्मचाऱ्यांचे मानधन अदा करण्याच्या दृष्टीने आवश्यक आहे. सबब, सदर उद्दिष्टाखाली मागणी केलेली रक्कम या उद्दिष्टामधून वितरीत करणे सद्यस्थितीमध्ये शक्य नसल्याने आयुक्त महिला व बालविकास यांच्याकडून १९-आहार खर्च या उद्दिष्टाखालील संभाव्य बचतीमधून उक्त उद्दिष्टासाठी पुर्नवितरणाद्वारे निधी उपलब्ध करुन देण्याबाबत प्रस्ताव प्राप्त झाला होता. त्यानुसार वित्त विभागाने दिलेल्या मंजूरीनुसार पुनर्वितरणाद्वारे निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता मागणी क्रमांक एक्स १ मुख्य लेखाशीर्ष २२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण अंतर्गत "भिक्षेकरी गृहे" (अनिवार्य) १०४- वृद्ध विकलांग व निराश्रित व्यक्तीचे कल्याण, (०१)(०१) भिक्षेकरीगृह अनिवार्य २२३५-२८७८ या लेखाशीर्षाअंतर्गत रु. ३१७.०३.लक्ष (अक्षरी रु. तीन कोटी सतरा लाख तीन हजार रुपये) इतक्या अर्थसंकल्पित निधीपैकी रु. ११७.५० लक्ष वितरीत लेखानुदानाद्वारे प्राप्त झाला आहे. या निधीमधून रु.१,६५,५६४/- (अक्षरी रुपये एक लाख पासष्ट हजार पाचशे चौसष्ट फक्त) इतका निधी १०-कंत्राटी सेवा या उद्दिष्टाखाली खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे पुनर्वितरीत करण्यास

मान्यता देण्यात येत असून सदर निधी आयुक्त, महिला व बालविकास आयुक्तालय, पुणे यांच्या अधिनस्त मंजूर करण्यात येत आहे.

| अ. क्र | लेखाशिर्ष | उद्दिष्ट | मुळ तरतूद | पुनर्वितरण | पुनर्वितरणानंतर उपलब्ध तरतूद |
|---|---|---|---|---|---|
| १ | २२३५-२८७८ | १९-आहार खर्च | ३,१७,०३,०००/- | (-)१,६५,५६४/- | ३,१५,३७,४३६/- |
| | | १०-कंत्राटी सेवा | ६,२५,०००/- | (+)१,६५,५६४/- | ७,९०,५६४/- |

२. सदर निधी महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियमपुस्तिका व वित्तीय अधिकार नियमांमध्ये विहित केलेल्या अटी व शर्तीचे पालन करुन खर्च करण्यात यावा. तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.१ एप्रिल, २०२४ मधील मार्गदर्शक सुचना व त्या सोबतच्या परिशिष्टातील अ.क्र.९ मध्ये नमूद अटी/शर्तीची पुर्तता करण्याची दक्षता घेण्यात यावी.

३. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे हे राहतील. सदर निधी ज्या प्रयोजनासाठी आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च होईल व खर्च झालेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास त्वरीत सादर करण्यात येईल याची संबंधितांनी दक्षता घ्यावी. यापुर्वी वितरीत केलेल्या अनुदानाची उपयोगिता प्रमाणपत्रे प्राप्त झाल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १७९/व्यय-६, दि.८.०७.२०२४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०७१२१५०१३९४२३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NEELIMA PRAMOD CHAUDHARI

Digitally signed by NEELIMA PRAMOD CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, 2.5.4.20=2d492c577d5f8956310c91dc01ffb9a071206c77d27a3be4e52d7c1b29fcf933, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AA21FB5959CBBFBF3AA97101D99F5D77D2333AE1AC39229E507A3EBF86EC6CD4, cn=NEELIMA PRAMOD CHAUDHARI
Date: 2024.07.12 15:13:13 +05'30'

**( नीलिमा चौधरी )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर.
२. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
५. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (आयुक्तालयामार्फत)
७. वित्त विभाग(व्यय-६), मंत्रालय, मुंबई.
८. कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई, यांना विनंती करण्यात येते की, सदर निधी आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना तात्काळ वितरीत करण्यात यावा.
९. कक्ष अधिकारी (का-७), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवड नस्ती (का-९)